मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद या पदावर श्री.अजमतुल्ला रहमतुल्ला कुरेशी, दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर (सध्या सचिव, जिल्हा न्यायिक सेवा प्राधिकरण, नांदेड पदावर कार्यरत) यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : वक्फ २०१६/प्र.क्र.१९७/कार्यासन-४,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ३ जानेवारी, २०१७.

**वाचा :** १) शासन आदेश, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्र. वक्फ २०१३/प्र.क्र.१२७/का-४, दि.२ सप्टेंबर, २०१५.

२) प्रभारी महानिबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र (इंग्रजी) क्र.ए.१२०६/२०००/४३६५/२, दि.२६ ऑक्टोबर, २०१६.

३) शासन पत्र, विधी व न्याय विभाग, क्र.डीएजे १५१६/प्र.क्र.१३१/का-३, दि.२६ ऑक्टोबर, २०१६.

**प्रस्तावना**

उपरोल्लेखित दि.२ सप्टेंबर, २०१५ च्या शासन आदेशान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, पनचक्की, औरंगाबाद या पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेशापर्यंत श्रीमती नसीमबानू नझीर पटेल, जिल्हा अधिक्षक, भूमी अभिलेख, औरंगाबाद यांच्याकडे सोपविण्यात आला होता. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद या पदावर नियमित नियुक्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

वक्फ अधिनियम, १९९५ यामधील कलम २३ मधील उप कलम *(१)* तसेच महाराष्ट्र वक्फ नियम, २००३ या मधील नियम क्रमांक ७ च्या उपकलम *(२)* तसेच महाराष्ट्र वक्फ (सुधारणा) नियम, २००३ या मधील नियम क्रमांक ७ च्या उपकलम *(१)* च्या पोटकलम *(अ)* अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन पनचक्की, औरंगाबाद येथे मुख्यालय असलेल्या महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळाच्या मुख्य कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्ती करण्यासंदर्भात यापुर्वी निर्गमित करण्यात आलेले सर्व आदेश/शासन निर्णय/अधिसूचना अधिक्रमित करुन, श्री.अजमतुल्ला रहमतुल्ला कुरेशी, दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर (सध्या सचिव, जिल्हा न्यायिक सेवा प्राधिकरण, नांदेड पदावर कार्यरत) यांची प्रतिनियुक्तीने मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, पनचक्की, औरंगाबाद म्हणून नियुक्ती करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. महाराष्ट्र वक्फ नियम, २००३ या मधील नियम क्रमांक ७ च्या उपकलम *(२)* येथील तरतुदींनुसार श्री.अजमतुल्ला रहमतुल्ला कुरेशी, दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, पनचक्की, औरंगाबाद या पदावरील नियुक्ती सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३

वर्षाचा कालावधी किंवा शासनाच्या पुढील आदेशापर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी, करण्यात येत आहे.

३. श्री.अजमतुल्ला रहमतुल्ला कुरेशी, दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर यांनी उपरोल्लेखित पदाचा कार्यभार श्रीमती नसीमबानू नझीर पटेल, जिल्हा अधिक्षक, भूमी अभिलेख, औरंगाबाद यांच्याकडून तात्काळ स्वीकारुन रुजू अहवाल शासनास पाठवावा. श्री.अजमतुल्ला रहमतुल्ला कुरेशी, यांनी उपरोक्त पदाचा कार्यभार स्विकारल्यानंतर श्रीमती नसीमबानू नझीर पटेल, जिल्हा अधिक्षक, भूमी अभिलेख, औरंगाबाद यांच्याकडे सोपविण्यात आलेला सदर पदाचा अतिरिक्त कार्यभार आपोआप संपुष्टात येईल.

४. श्री.अजमतुल्ला रहमतुल्ला कुरेशी, दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, पनचक्की, औरंगाबाद हे पद ग्रहण केल्यावर त्यांना न्यायिक सेवेतील सेवाविषयक नियम तसेच वक्फ अधिनियम, १९९५ व महाराष्ट्र वक्फ नियम, २००३ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या अटी व शर्ती लागू होतील.

५. श्री.अजमतुल्ला रहमतुल्ला कुरेशी, दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, पनचक्की, औरंगाबाद हे पद ग्रहण केल्यावर त्यांना त्यांच्या न्यायिक सेवेतील मूळ पदाला अनुज्ञेय असलेल्या दराने वेतन व भत्ते अधिक प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असेल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०३१६०४२४३६१४ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shyam Arjunrao Tagade

Digitally signed by Shyam Arjunrao Tagade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ebdccd1ea7bd29723d76653e72dddcc5cf97ff4fb69ce412d0d3c6d5c23adc3e, cn=Shyam Arjunrao Tagade
Date: 2017.01.09 17:23:03 +05'30'

**( श्याम तागडे )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महा निबंधक, उच्च न्यायालय, मुंबई - ४०० ०३२.
२. महालेखापाल (१/२), लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (१/२), लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
५. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. विभागीय आयुक्त, औरंगाबाद,
१३. सर्व विभागीय आयुक्त, (विभागीय आयुक्त, औरंगाबाद, वगळून)
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. उप सचिव (श्री.तडवी/श्री.चौरे), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय , मुंबई,
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद,
१७. कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
१८. श्री.अजमतुल्ला रहमतुल्ला कुरेशी, दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर (सध्या सचिव, जिल्हा न्यायायिक सेवा प्राधिकरण, नांदेड पदावर कार्यरत),
१९. श्रीमती नसीमबानू नझीर पटेल, मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद, (अतिरिक्त कार्यभार) तथा जिल्हा अधिक्षक, भूमी अभिलेख, औरंगाबाद
२०. मा.मंत्री (अल्पसंख्यांक) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२१. मा.राज्यमंत्री (अल्पसंख्यांक) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२२. सर्व अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. सर्व कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. निवड नस्ती/कार्यासन-४, संग्रहार्थ.